**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील**
**‘सचिव’ पदाचे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासंसे-२०१४/प्र.क्र.१०/२०१४/आस्था-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १६ जुलै, २०१५.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील सचिव, गट-अ या पदाच्या दि.१६ नोव्हेंबर, १९७१ रोजी प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियम अधिक्रमित करुन सोबतच्या अधिसूचनेत (इंग्रजी व मराठी) दर्शविल्याप्रमाणे सेवाप्रवेश नियम शासन विहित करीत आहे.

२. उपरोक्त अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०७१७१२३३२३९३३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Aparna Arvind Gawde
Date: 2015.07.17 17:42:30 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने).
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.

९. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
१०.सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१३.व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई (पत्राने).
१४.सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
१५.मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने.
१६.निवड नस्ती.

## NOTIFICATION

Marathi Language Department,
Madam Cama Marg,
Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya, Mumbai 400 032.
Dated the 16th July, 2015.

Constitution of India.

No.LCR-2014/CR10/2014/Aastha-2 - In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Secretary, Group-A in the State Board of Literature and Culture under the Marathi Language Department of the Government of Maharashtra, namely :-

1. These rules may be called the Secretary, Group-A, in the State Board of Literature and Culture under the Marathi Language Department (Recruitment) Rules, 2015.

2. In these rules, unless the context requires otherwise,-

(a) "Board" means the State Board of Literature and Culture under the administrative control of the Marathi Language Department of the Government;

(b) "Commission" means the Maharashtra Public Service Commission;

(c) "Degree" means a degree of a statutory University;

(d) "Department" means the Marathi Language Department of the Government;

(e) "Government" means the Government of Maharashtra;

(f) "Masters' degree" means a Masters' degree of a statutory University.

3. Appointment to the post of Secretary, in the Board shall be made either,-

*(a)* by nomination from amongst the following candidates who ,-

*(i)* are not more than forty-five years of age:

Provided that, the upper age limit shall be relaxed upto five years in case of candidates already in the Government Service;

*(ii)* possess a degree in Marathi or Sanskrit subject with atleast fifty-five percent marks; and Masters' degree in Marathi or Sanskrit subject with atleast fifty-five percent marks;

*(iii)* possess practical experience of working in an administrative executive post in a responsible position for a minimum period of five years, gained after acquiring the educational qualifications mentioned in sub-clause *(ii)*;

or

*(b)* by transfer on deputation of a suitable person holding an equivalent post in any Department or office of the Government and possessing the qualifications and experience prescribed for appointment by nomination in sub-clauses (*ii*) and (*iii*) of sub-rule (*a*);

or

*(c)* by deputation of a suitable person holding an equivalent post and possessing the qualifications and experience prescribed for appointment by nomination in sub-clause (*ii*) and (*iii*) of sub-rule (*a*).

Note - (I) The expression "responsible position" mentioned in sub-clause *(iii)* of clause (*a*) means a Gazetted post in Pay Band – P.B.–2 Rs.9300-34800, Grade Pay Rs.4400/- or more than that Pay Band and Grade Pay in Government or in Public Sector Organisation or Institute or Institution and include the post in other field, which will ensure equivalency to the post in these Pay Band and Grade Pay.

(II) Appointment on deputation means, the service in which a Government servant receives his pay with the sanction of Government from any source other than the Consolidated Fund of the State Government.

4. A person appointed to the post mentioned in rule 3 by nomination shall be on probation for a period of two years. Probation period may be extended maximum upto one year. A person appointed shall be required to complete the probation period satisfactorily. If he does not complete the probation period satisfactorily or is not found suitable for the post, his service shall be liable to be terminated.

5. A person appointed to the post mentioned in rule 3, shall be required to complete successfully the training prescribed by the Government, from time to time.

6. A person appointed to the post mentioned in rule 3, shall be required to pass examination in Marathi and Hindi languages according to the rules made in that behalf, unless he has already passed or has been exempted from passing the said examination.

7. A person appointed to the post mentioned in rule 3 should possess a certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information & Technology, Government of Maharashtra, from time to time.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

A.A. Gawde

(Aparna A. Gawde)
Deputy Secretary to Government.

## अधिसूचना

मराठी भाषा विभाग,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ जुलै, २०१५.

**भारताचे संविधान**

क्रमांक :- सासंसे-२०१४/प्र.क्र.१०/२०१४/आस्था-२ - भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि त्याबाबतीत करण्यात आलेल्या सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश यांचे अधिक्रमण करुन, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या, मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामधील सचिव, गट-अ पदाच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, ते असे :-

१. या नियमांस, मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील सचिव, गट-अ (सेवाप्रवेश) नियम, २०१५ असे म्हणावे.

२. या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,-

(क) "**मंडळ**" याचा अर्थ, शासनाच्या मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ;

(ख) "**आयोग**" याचा अर्थ, महाराष्ट्र लोकसेवा आयोग;

(ग) "**पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी;

(घ) "**विभाग**" याचा अर्थ, शासनाचा मराठी भाषा विभाग;

(ङ) "**शासन**" याचा अर्थ, महाराष्ट्र शासन;

(च) "**पदव्युत्तर पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी.

३. मंडळामधील **सचिव** पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल-

(अ) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,-

(एक) ज्यांचे वय पंचेचाळीस वर्षापेक्षा अधिक नाही:

परंतु, अगोदरपासून शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षापर्यंत शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्यांनी, मराठी किंवा संस्कृत विषयातील पदवी किमान पंचावन्न टक्के गुणांसह आणि मराठी किंवा संस्कृत विषयातील पदव्युत्तर पदवी किमान पंचावन्न टक्के गुणासह धारण केली आहे;

(तीन) ज्यांनी, उपखंड (दोन) मध्ये नमूद केलेली शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्यानंतर जबाबदारीच्या दर्जाच्या प्रशासकीय कार्यकारी पदावरील प्रत्यक्ष कामाचा किमान पाच वर्षे इतका कालावधीचा अनुभव धारण केला आहे;

किंवा

(ब) शासनाच्या कोणत्याही विभागातील / कार्यालयातील समकक्ष पद धारण करणाऱ्या आणि नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी उप-नियम (अ) मधील उपखंड (दोन) आणि (तीन) मधील विहित शैक्षणिक अर्हता आणि अनुभव धारण करणाऱ्या योग्य व्यक्तीच्या बदलीने प्रतिनियुक्तीवर;

किंवा

(क) प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी समकक्ष पद धारण करणाऱ्या आणि नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी उप-नियम (अ) मधील उपखंड (दोन) आणि (तीन) मधील विहित शैक्षणिक अर्हता आणि अनुभव धारण करणाऱ्या योग्य व्यक्तींमधून.

**टीप** : १) उप-नियम (अ) मधील उप खंड (तीन) मधील "जबाबदारीच्या दर्जाच्या" या शब्दाप्रयोगामध्ये शासनामधील किंवा सार्वजनिक क्षेत्रातील, संस्था किंवा परिसंस्था यामधील वेतनबँड पी.बी.-२ रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.४४००/- किंवा त्यापेक्षा वरच्या वेतनबँड व ग्रेड पे मधील राजपत्रित पद असे अपेक्षित आहे. तसेच यामध्ये सदर वेतनबँड व ग्रेड पे मधील पदाशी समकक्षता सुनिश्चित करता येईल, अशा अन्य क्षेत्रातील पदाचादेखील समावेश राहील.

२) प्रतिनियुक्तीने नियुक्ती म्हणजे राज्य शासनाच्या एकत्रित निधीव्यतिरिक्त अन्य निधी मधून वेतन मंजूर करण्यात येते अशा सेवेतून नियुक्ती.

४. नियम ३ मध्ये नमूद केलेल्या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त केलेली व्यक्ती दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीवर राहील. परिवीक्षा कालावधी कमाल एक वर्षापर्यंत वाढवता येईल. सदर पदावर नियुक्त व्यक्तीने परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील. त्याने परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण न केल्यास किंवा तो सदर पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास त्याची / तिची सेवा समाप्त करण्यास पात्र राहील.

५. नियम ३ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, शासन वेळोवेळी विहित करेल असे प्रशिक्षण यशस्वीरीत्या पूर्ण करणे आवश्यक राहील.

६. नियम ३ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, त्याबाबतीत केलेल्या नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केलेली नसेल किंवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळालेली नसेल तर, त्याला सदर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

७. नियम ३ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडून वेळोवेळी विहित केलेले "संगणक हाताळणीबाबतचे प्रमाणपत्र" धारण करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अपर्णा अ.गावडे)
शासनाचे उप सचिव